# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## अविश्वासी लोकांचा प्रादुर्भाव

संत महंत साहित्याचा भौगोलिक, ऐतिहासिक, समाजशास्त्राच्या अंगाने केलेले रसग्रहण













**संकलन: शशिकांत ओक**

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र – एक अभ्यास (भाग ८)










# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## अविश्वासी लोकांचा प्रादुर्भाव

- आजकाल भारतीय संस्कृतीच्या विचारांना अमान्य करुन त्यातून असे घडणे शक्य नाही, आजच्या शास्त्राला ते मान्य नाही, अशी ओरड करणारे लोक आणि काही संस्था आपल्या पाहण्यात असतात. प्राचीन काळापासून असे लोक त्या त्या काळात होते त्यांचे सामाजिक रुप बदलत गेले पण मनोवृत्ती तशीच राहिली. सध्या या मंडळींना निरीश्वरवादी म्हणून मान्यता असते. पुर्वीचे लोक ईश्वरवादी असून त्यांच्या प्रस्थापित विचारधारेला विसंगतीतून संघर्ष निर्माण होत असे जाणवते.
- याची काही उदाहरणे पोथीतील कथनातून प्रकर्षाने नोंदवली गेली आहेत. त्यांचे विचार विसंवाद, वादावादीचे प्रसंग, पंचम वर्गीय अंत्यजांना त्यांच्या वस्तीत जाऊन दत्त संप्रदायाची दीक्षा फुकट दिल्या नंतर, त्यांच्या आईवडिलांना वाळीत टाकले जायची भिती वाटून, ‘तू पीठापुरम सोडून जाऊ नकोस’ असा लकडा लावला असावा.
- “घरीच रहा, पीठापुरम सोडून जाऊ नको म्हणून तुम्ही घरच्यांनी मला गळ घातली तरी मी घर सोडून निघून जाणार असे लहानपणापासून ते म्हणत असत. हे माहित असूनही आईवडिलांना गावकीच्या वाळीत टाकतील या भितीने इतके घेरले असावे की ते’ वचन मोडायला’ तयार व्हायला त्यांची मनस्थिती पूरक झाली असावी.
- म्हणून आई वडिलांना सोडून ते उत्तरभारताची यात्रा करायला मी घराबाहेर जाईन असे वचनाची आठवण देऊन भावाच्या बहिणींना योग्य ते आशीर्वाद देऊन निघून गेले. कदाचित काही काळानंतर त्यांच्या कुटुंबियांना ती वास्तू सोडून जावे लागले.
- त्या जागेची मालकी कालांतराने परत त्यांच्या कुळातील वारसांना ती वास्तू मिळून पीठापुरममधे त्यांच्या जमिनीत खोल पुरलेल्या पादुका आणि शंकर भट्टांनी लिहिलेली पोथी बाहेर काढून मग त्या वास्तूला व पोथाला अत्यंत पावित्र्य व लोकमान्यता मिळाली.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## सगळी नाटके आहेत

- अ १०.८१ अप्पलराज शर्मा श्रींचे वडील म्हणतात, बेटा, तू नेहमी सांगतोस, मी दत्त प्रभू आहे, नृसिंहसरस्वती नावाने पुन्हा अवतार घेणार आहे, लहानपणापासून तू आम्हाला अनाकलनीय आहेस. पण लोक कावळ्यासारखे असतात रे, तुझे बोलणे ऐकून ते म्हणतात, ‘ही याची सगळी नाटके आहेत. फालतूच्या गप्पा आहेत. वेड्यासारखा बरळतो झाले.”
- अ २०.१६५ सावधानी नामक शास्त्री ब्राह्मणसभेत वितंडवाद घालत म्हणत, ‘श्रीपादच दत्त कशावरून मल्लादि व घंटीकोट यांना समाजातून बहिष्कृत करावे. कारण ते धर्मभ्रष्ट व अनाचारी आहेत’.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## दृष्टीभ्रम किंवा इंद्रजाल

- अ. ५. ३७ गणपती असा सोंडेने प्रसाद खाऊ शकणार नाही हा दृष्टीभ्रम किंवा इंद्रजाल प्रकार आहे. असा वाद काढला. यानंतर आकाशवाणी होऊन नस्तिकांना शाप मात्र त्यांच्या मुळे काणिपुरमला वरद विनायकाच्या मूर्तीची स्थापना झाली.

५

- अ. १४.१११ दास आणि मालदास यांना भेटायला श्री वय ८ मुंजीनंतर लगेच हवाई मार्गाने गेले.
- लीलावैभव पोथी अ. ११. ९७ व्याघ्राजिन कमलदलांच्या वरून आगमन.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## दंभाचार आहे

- अ २०.१६५ विस्सावधानी नामक शास्त्री ब्राह्मणसभेत वितंडवाद घालत म्हणत, 'श्रीपादच दत्त कशावरून मल्लादि व घंटीकोट यांना समाजातून बहिष्कृत करावे. कारण ते धर्मभ्रष्ट व अनाचारी आहेत'...
- अ२२.१७१ वायसपुरातील पंडित म्हणाला, 'वेदस्वरूपी परमात्मा कुठे! अन हा लहानसा श्रीपाद कुठे! हा सृष्टी, स्थिती, लयकारक म्हणे! हे सारे असत्य आहे. हा दंभाचार आहे'.
- अ २८.१८९ श्रीपाद सोळा वर्षांचे दिसत होते व ती बालिका तीन वर्षे ती दिसत होती. ती श्रीपादांसारखीच रेशमी वस्त्रात होती. आमचा मनात हे सत्य की जादू, इंद्रजाल तर नव्हे? असे विचार जाणून श्री म्हणाले, 'शंकर भट्ट ही माझी दिव्य प्रकृती आहे.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## चरित्राला आधार काय

- अ. ३०.१९९ आधीच्या तू लिहिलेल्या माझ्या चरित्राला आधार काय? ते कसे मान्य करावे? असे विचारणारे महाभाग असणार.
- ज्ञानसंख्या १७०१४,११८३४,६०४६७,९२३१७,३१६८७,३०३७१,५८८४१, ०५७२७ ही ४० आकडी विश्वसंख्या त्याचा अर्थ अंतरार्थतील पदार्थतत्व शोधणाऱ्यास परार्थ पदार्थतत्व शोधणाऱ्यास त्यांच्या स्थायीनुसार अवगत होणार असे श्रीपाद म्हणाले.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## अ 4.24 अवतार संकल्पपूर्ती

- कुठलेही जप, तप, योग प्रक्रियानी किंवा कुठल्याही विधीविधानांनी कुणीही मला प्राप्त करू शकत नाही.
- केवल अनुग्रह विशेषानीच मी प्राप्त होऊ शकतो. माझ्यात लीन झालेले पुण्यात्मा त्या त्या संदर्भानुसार, स्थूल शरीराने अवतरून माझी संकल्प पूर्ती करतात.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## कर्मचक्र सिद्धांत

- कर्मचक्र सिद्धांत ( अ. ८ कर्मचक्र परिणाम)
- पुरूष प्रधानतेच्या संकल्पनांवरील श्रींचे अन्य संतांचे व त्या काळातील धुरिणांचा विचार, संघर्ष (अ. १० संतकार्य मानवाला दैवत्वाकडे वळवणे अत्यंत आवश्यक आहे. यासाठी देव आपले देवत्व सोडून थोडा खालच्या पातळीवर उतरतो. यालाच अवतरण म्हणतात.) (अ ४३५ कर्मविपाक सिद्धांत हा सूक्ष्म व अढळ असतो. हे जाणून प्रत्येकाने सत्कर्म करावे व दुष्कर्म टाळावे.)
- पीठिका पुरात कोण, काय आणि केंव्हा अफवा पसरवेल देव जाणे.अ. ४२.२४१

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

## भविष्यातील पिढीला स्फूर्तिदायक चरित्र

- ❖ अ २८.१८९ ‘बेटा शंकर भट्टा, चरित्रामृत जसेच्या तसे लिही. ते भविष्यातील पुढच्या पिढीचा लोकांना स्फूर्तिदायक होईल. अनेक संशय मिटतील. नवीन शक्ती, भक्ती व उत्साह अस्तिकातच नव्हे नास्तिकांतही जागृत होईल.
- ❖ अ ३३. खरेतर कालीमाता साधकाच्या अंतर्मनात दडलेल्या कामक्रोधादि राक्षस शक्तींचा विध्वंस करते. ती कोंबड्या-बकऱ्यांचे बळी मागत नाही. खरी कालीकामाता प्रेम, शांती, दया वगैरे शुभ लक्षणांनी युक्त असते. या प्राणमय जगात राक्षस शक्ती, भूतप्रेत आदि निर्माण करणारी कालीमाता होय. ‘आम्ही आमके, आम्ही तमके’ असा अहंकार मिरवणारे मांत्रिक शूद्र विद्यांची उपासना करून लोकांना प्रेत आत्म्यालाही ते देवतास्वरूप देतात.’ असे म्हणून ते यति गुप्त झाले. आम्ही आमचे घर धुवून पुसून स्वच्छ केले. मांत्रिकाला हाकलून श्रीपादांनी आशीर्वादपूर्वक आपल्या दिव्य हस्ताने माझे रमणीचे लग्न लावून. तेव्हा श्रीपादांचे वय फक्त बारा वर्षाचे होते. त्यावेळी ते पीठिकापूरलाच होते.

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्र - एक अभ्यास (भाग ८)

भाग ८ समाप्त

**पोथीतील तिथी, वार, नक्षत्र, वर्षाचे आणि पंचांगातील संदर्भ**

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ
दिगंबरा । श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये ।।